**पथकिनारवर्ती नियमात एकसूत्रता आणण्यासाठी 'इमारत रेषा' व 'नियंत्रण रेषा' याकरिता घ्यावयाची अंतरे.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शुध्दीपत्रक क्रमांक - आरबीडी - १००१/७२/रस्ते - ७.**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक - ७ जानेवारी, २००२.**

**वाचा** - १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक-आरबीडी-१०८१/८७१/रस्ते-७, दिनांक ९ मार्च, २००१.
२) पूरकपत्र सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक-आरबीडी-१००१/७२/रस्ते-७, दिनांक २१ सप्टेंबर, २००१.

*शुध्दीपत्रक -:*

पथकिनारवर्ती नियमात एकसूत्रता आणण्यासाठी शासन निर्णय क्रमांक-आरबीडी १०८१/८७१/रस्ते-७, दिनांक ९ मार्च, २००१ अन्वये पथकिनारवर्ती नियमानुसार 'इमारत रेषा' व 'नियंत्रण रेषा' या करिता सुधारीत अंतरे लागू करण्यात आलेली आहेत. या शासन निर्णयात, पूरकपत्र क्रमांक आरबीडी/७२/रस्ते-७, दिनांक २१ सप्टेंबर, २००१ नुसार नागरी/औद्योगिक क्षेत्रात वळण रस्त्यासाठी 'इमारत रेषेचे' अंतर ४० मीटर घेण्याबाबत टीप क्रमांक ६ नव्याने अंतर्भूत करण्यात आलेली आहे. या पूरक पत्रातील टीप क्र. ६ मध्ये "राष्ट्रीय महामार्ग, प्रमुख राज्य महामार्ग व राज्य महामार्ग व याकरिता शहराबाहेरून वळण रस्ता बांधण्यात आल्यानंतर हा वळण रस्ता नगरपालिका हद्दीत / नागरी किंवा औद्योगिक क्षेत्रात येत असला तरी त्यासाठी 'इमारत रेषा' रस्त्याच्या मध्यापासुन ४० मीटर अंतरावर घेण्यात यावी" असे नमूद केले होते. त्यात बदल करण्यात येत असुन त्या ऐवजी टीप क्र.६ खालील प्रमाणे वाचण्यात यावी.

"राष्ट्रीय महामार्ग, प्रमुख राज्य महामार्ग व राज्य महामार्ग याकरिता शहराबाहेरून वळण रस्ता बांधण्यात आल्यानंतर हा वळण रस्ता नागरी / औद्योगिक किंवा अनागरी क्षेत्रात येत असला तरी त्यासाठी 'इमारत रेषा' वळण रस्त्याच्या मध्यापासुन ४० मीटर अंतरावर व 'नियंत्रण रेषा' वळण रस्त्याच्या मध्यापासुन ७५ मीटर अंतरावर घेण्यात यावी."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सं श्री. काळे)
अवर सचिव महाराष्ट्र शासन

H-919(1000-1-02)1

(कृ. मा. प.)

D:\GAWAS\RBDR\R-7

प्रत -

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (सा. बां.), यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (सा. बां.) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव (महसुल), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सचिव, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सार्वजनिक बांधकाम विभागातील रस्ते व इमारती कार्यासनातील सर्व अधिकारी व कार्यासने
सहव्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपियन सी रोड, मुंबई
सर्व मुख्य अभियंते (विद्युत वगळून)
सर्व महसूल आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
संचालक, नगर रचना व मुल्य निर्धारण विभाग, सेंट्रल बिल्डिंग, पूणे.
सर्व अधिक्षक अभियंते (विद्युत वगळून)
सर्व कार्यकारी अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग (विद्युत वगळून)/सर्व जिल्हापरिषद
सर्व महानगरपालिका/नगरपालिका
निवड नस्ती, कार्यासन रस्ते - ७.

* * * * * * *

H-919(1000-1-02)1a.